**डिसेंबर २०१७ मध्ये ओखी चक्रीवादळामुळे नुकसान झालेल्या बाधित मच्छिमारांना मदत देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- सीएलएस-२०१७/प्र.क्र.३२२/म-३**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
तारीख: १२ जुलै, २०१८

**वाचा -**

१) शासन निर्णय,महसूल व वन विभाग,क्रमांक: सीएलएस-२०१५ /प्र.क्र.४०/म-३,दि. १३.५.२०१५

२) शासन निर्णय, महसुल व वन विभाग, क्रमांक: सीएलएस-२०१७/प्र.क्र.३२०/म-३, दि.२१.२.२०१८

३) विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांचे पत्र क्रमांक मशा/नै.आ/कार्या-६/ओखी वादळ अनुदान मागणी /२०१८, दिनांक १९.३.२०१८ चे पत्र

**प्रस्तावना -**

दिनांक ४ ते ६ डिसेंबर २०१७ या कालावधीत राज्यात आलेल्या ओखी चक्रीवादळामुळे नुकसान झालेल्या मच्छिमार बोटी व जाळीच्या नुकसानीसाठी बाधितांना मदत मंजूर करण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. त्यानुसार बाधित मच्छिमारांना मदत देण्यासाठी आवश्यक असलेल्या निधीची मागणी विभागीय आयुक्त,कोकण यांनी संदर्भाधीन क्रमांक ३ येथील पत्रान्वये केली आहे. या प्रयोजनाकरिता आवश्यक निधी वितरित करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

दिनांक ४ ते ६ डिसेंबर २०१७ या कालावधीत राज्यात आलेल्या ओखी चक्रीवादळामुळे नुकसान झालेल्या मच्छिमार बोटी व जाळीच्या नुकसानीसाठी बाधितांना मदत वाटप करण्यासाठी या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्टाप्रमाणे एकूण रूपये ७५.४१ लक्ष (रूपये पंचाहत्तर लक्ष एकेचाळीस हजार फक्त) इतकी रक्कम वितरित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. बाधित मच्छिमारांना मदतीचे वाटप करताना खालील अटी, शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घ्यावी :

१. मत्सव्यवसाय विभाग व महसुल यंत्रणेच्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांकडून करण्यात आलेल्या पंचनाम्याच्या आधारे मच्छिमार बोटींचे व जाळीचे नुकसान झालेल्या प्रकरणी बाधित मच्छिमारांना मदत अनुज्ञेय राहील.

२. मदतीची रक्कम संबंधित बाधितांच्या बँक खात्यात थेट जमा करण्यात यावी. कोणत्याही बाधितांना रोख अथवा निविष्ठा स्वरूपात मदत देण्यात येऊ नये.

३. मदतीची रक्कम बाधितांच्या बँक खात्यावर थेट जमा करतांना मदतीच्या रक्कमेमधून कोणत्याही बँकेने कोणत्याही प्रकारची वसुली करु नये.

४. जिल्हयांना वितरित केलेल्या रकमेचे बाधितांना वाटप पूर्ण झाल्यानंतर, रक्कम वाटप करण्यात केलेल्या लाभार्थ्यांची यादी त्यांना प्रदान केलेल्या रकमेच्या माहितीसह जिल्हाधिकारी

कार्यालयाच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करावी. तसे केल्याचे प्रमाणपत्र व निधीचा विनियोग केल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनाकडे पाठविण्यात यावे.

५. बाधित मच्छिमारांना वाटप करावयाची मदतीची रक्कम संबंधित लाभार्थ्यांच्या आधार संलग्नित बॅक खात्यामध्ये थेट हस्तांतर पध्दतीने (Direct Benefit Transfer) प्रदान करावी.परंतु एखादया व्यक्तीकडे आधार क्रमांक नसेल तर अशी व्यक्ती लाभापासून वंचित राहू नये म्हणून अन्य पर्यायी व व्यवहार्य ओळखपत्राच्याआधारे( उदा. आधार ओळख नोंदणी पावती, भारत निवडणूक आयोगाने दिलेले मतदान ओळखपत्र, आयकर विभागाने दिलेले स्थायी लेखा क्रमांक पत्र (PAN), वाहन चालविण्याचा परवाना, पारपत्र, बँकेची पुस्तिका) खातरजमा करून प्रदान करण्यात यावेत.

६. शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक २१.२.२०१८ मध्ये नमूद केलेल्या अटी व शर्ती लागू राहतील.

३. या प्रयोजनावर होणारा खर्च मागणी क्रमांक सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी मदत, ०२, पुर,चक्रीवादळे इत्यादी, ९१, राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) हानी पोहचलेल्या होडया व मासेमारी साधनसामग्री, यांची दुरूस्ती/ती नव्याने पुरवणे यासाठी सहाय्य (२२४५०३२४) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७१२१७२७३०९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2018.07.12 17:29:27 +05'30'

**(सु.ह.उमराणीकर)**
उपसचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन,मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,मंत्रालय,मुंबई,
३. मा विरोधी पक्ष नेते, विधानसभा/विधान परिषद, विधानभवन,मुंबई,
४. महाराष्ट्र विधानमंडळातील सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
५. महाराष्ट्रातील सर्व मा. लोकसभा/राज्यसभा सदस्य
६. मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (वित्त),मंत्रालय,मुंबई

८. विभागीय आयुक्त,कोकण
९. जिल्हाधिकारी , रायगड/रत्नागिरी/सिंधुदुर्ग/पालघर
१०. वित्तिय सल्लागार तथा सहसचिव,मदत व पुनर्वसन विभाग, (आवश्यक रक्कम बीम्स प्रणालीवर उपलब्ध करून देण्याच्या विनंतीसह अग्रेषित)
११. मा.मंत्री(मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१२. मा.राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१३. वित्त विभाग (कार्यासन-व्यय-९/अर्थ-६)
१४. कार्यासन क्रमांक म-११/म-७, मदत व पुनर्वसन,
१५. निवड नस्ती (कार्यासन म- ३)

शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्रमांक: सीएलएस-२०१७/प्र.क्र.३२२/म-३,
दिनांक १२ जुलै, २०१८ चे परिशिष्ट

ओखी चक्रीवादळामुळे नुकसान झालेल्या मच्छिमार बोटी व जाळींच्या नुकसानीसाठी

बाधितांना मदत देण्यासाठी आवश्यक असलेल्या निधीचा जिल्हानिहाय तपशील

| अ.क्र. | जिल्हा | बोटीचे अंशत: नुकासान | बोटींचे पुर्णत: नुकसान | जाळयांचे पुर्णत: नुकसान | एकूण आवश्यक मदत |
|---|---|---|---|---|---|
| १ | पालघर | रू. ४,१००/- | -- | रू.४९,४००/- | रू.५३,५००/- |
| २ | रायगड | रू.८,२००/- | -- | रू.५,२००/- | रू.१३,४००/- |
| ३ | रत्नागिरी | -- | रू.४८,०००/- | रू.५३,१४,४००/- | रू.५३,६२,४००/- |
| ४ | सिंधुदुर्ग | रू.२०,५००/- | रू.१,१५,२००/- | रू.१९,७६,०००/- | रू.२१,११,७००/- |
| | | | | एकूण:- | रू.७५,४१,०००/- |

( रूपये पंच्याहत्तर लक्ष एकेचाळीस हजार फक्त)

***********